ठेव संलग्न विमा योजनेंतर्गत
निधी वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राछासे-२०२३ /प्र.क्र.५९/क्रीयुसे -३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २१ जून, २०२३.

वाचा:-

१. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक भनिनि १०१२/२५/प्र.क्र.१३३/ १२/ १३-अ, दि.१५ जानेवारी, २०१३
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१५
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२ एप्रिल, २०२३
४. क्रीडा व युवक सेवा पुणे यांचे पत्र क्रमांक.राछासे/डिलिंवियोअतउमंमि/२०२३-२४/का-५/ दि. ०९ मे, २०२३.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी वर्गणीदारांच्या कुटुंबियांना विशेष सामाजिक सुरक्षा मिळावी आणि शासकीय कर्मचाऱ्यांना त्यांच्या भविष्य निर्वाह निधीमधील बचत वाढविण्यास उत्तेजन मिळावे या हेतूने ठेव संलग्न विमा योजना, महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियम १९९८ मधील नियम क्र.३० अन्वये लागू करण्यात आलेली आहे. सामान्य प्रशासन विभागाच्या दि. १५ जानेवारी, २०१३ च्या शासन निर्णयान्वये ४८ महाराष्ट्र बटालियन, राष्ट्रीय छात्र सेना, धुळे या कार्यालयातील दिवंगत नितीन प्रभाकर शिंदे (वाहनचालक) यांच्या वारसांना ठेव संलग्न विमा योजनेअंतर्गत मिळणारी एकूण रु. ६०,०००/- इतकी रक्कम अदा करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

भविष्य निर्वाह निधी वर्गणीदारांच्या कुटुंबियांना विशेष सामाजिक सुरक्षा मिळावी आणि शासकीय कर्मचाऱ्यांना त्यांच्या भविष्य निर्वाह निधीमधील बचत वाढविण्यास उत्तेजन मिळावे या हेतूने लागू केलेल्या ठेव संलग्न विमा योजनेखाली, ४८ महाराष्ट्र बटालियन, राष्ट्रीय छात्र सेना, धुळे या कार्यालयातील दिवंगत नितीन प्रभाकर शिंदे (वाहनचालक) यांच्या वारसांना ठेव संलग्न विमा योजनेअंतर्गत अनुज्ञेय असणाऱ्या एकूण रु. ६०,०००/- इतक्या रकमेच्या मंजुरीस व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक : ई-३, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण ६०, इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम १०४, ठेव संलग्न विमा योजना-शासकीय भविष्य निर्वाह निधी (००)(००)(०१) ठेव संलग्न विमा योजना-शासकीय भविष्यनिर्वाह निधी (अनिवार्य) ५०, इतर खर्च, (२२३५ ०४८१) या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व तो सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या दि. १२ एप्रिल, २०२३ रोजीच्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. यासाठी संबंधित समादेशक अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी तसेच आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०६२११४४०३३७७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SHAILA BABAN YADAV
Date: 2023.06.21 14:42:07 +05'30'

**( शैला ब. यादव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव,
३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव,
४. मा.मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६. मा.सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई
७. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. अतिरिक्त महासंचालक, राष्ट्रीय छात्र सेना संचालनालय, मुंबई
११. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) -१/२, महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२,महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी (संचालनालयामार्फत)
१४. विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, नाशिक
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६. जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे
१७. समादेशक अधिकारी, ४८ महाराष्ट्र बटालियन, राष्ट्रीय छात्र सेना, धुळे
१८. अवर सचिव,वित्त विभाग-व्यय-५/विनियम/अर्थसंकल्प-८, मंत्रालय, मुंबई
१९. निवड नस्ती, क्रीयुसे-३.